**जम्मू काश्मीरमधील पहलगाम येथे झालेल्या दहशतवादी हल्ल्यात मृत्यूमुखी पडलेल्या राज्यातील पर्यटकांच्या वारसांना आर्थिक मदत करण्यासाठी लेखाशीर्ष २२३५ बी३८१ या लेखाशीर्षांतर्गत उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्याकरिता प्राधिकृत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण-०४/२०२५/प्र.क्र.५२/म-११**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ मे, २०२५

**संदर्भ :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.आरएलएस-२०२५/प्र.क्र.८९/म-३, दि.२३.०४.२०२५
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.आरएलएस-२०२५/प्र.क्र.८९/म-३, दि.९.०५.२०२५
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.आरएलएस-२०२५/प्र.क्र.८९ (भाग-१)/म-३, दि.२४.०४.२०२५.
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.२८.४.२०२५.

**शासन परिपत्रक:-**

जम्मू काश्मीरमधील पहलगाम येथे झालेल्या दहशतवादी हल्ल्यात जखमी झालेल्या राज्यातील पर्यटकांना रु.५०.०० हजार व मृत्यूमुखी पडलेल्या राज्यातील पर्यटकांच्या वारसांना रु.५.०० लक्ष इतकी आर्थिक मदत करण्याचा निर्णय संदर्भ क्र.१ येथील दि.२३.४.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. आता, संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये, जम्मू काश्मीरमधील पहलगाम येथे झालेल्या दहशतवादी हल्ल्यात मृत्यूमुखी पडलेल्या राज्यातील पर्यटकांच्या वारसांना रु.५.०० लक्षऐवजी रु.५०.०० लक्ष इतकी आर्थिक मदत करण्याचा निर्णय घेतला आहे.

२. दरम्यान, जम्मू काश्मीरमध्ये अडकून पडलेल्या राज्यातील पर्यटकांना महाराष्ट्रात परत आणण्यासाठी विमान प्रवासाचा खर्च उचलण्याचा निर्णय शासनाने संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. यावरील खर्च तातडीने भागविण्यात यावा, यासाठी मागणी क्र.सी-५; २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण; ६०, इतर सामाजिक सुरक्षा कल्याण कार्यक्रम; २००, इतर कार्यक्रम; (०१), दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य; (०१) (०५), दहशतवादी हल्ल्यात झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य (अनिवार्य); ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) **(२२३५ बी३८१)** या लेखाशीर्षांतर्गत उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्यास लेखाधिकारी, (आ.व्य.प्र.-६), मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

३. सबब, जम्मू काश्मीरमध्ये अडकून पडलेल्या राज्यातील पर्यटकांना "विशेष बाब" म्हणून महाराष्ट्रात परत आणण्यासाठी येणाऱ्या विमान प्रवासाच्या खर्चासह दहशतवादी हल्ल्यात मृत्यूमुखी पडलेल्या राज्यातील पर्यटकांच्या वारसांनादेखील आर्थिक मदत करण्यासाठी **लेखाशीर्ष २२३५ बी ३८१** अंतर्गत उणे (-) प्राधिकार पत्रावर कोषागारातून रक्कम आहरित करण्यास या शासन परिपत्रकान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. क्षेत्रीय कार्यालयांनी सदर उणे (-) प्राधिकार पत्राच्या सुविधेंतर्गत निधी वितरीत केल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व महालेखाकार कार्यालयास सादर करण्यात यावे.

५. सदरचे आदेश वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२७४/२०२५/व्यय-९, दि.१४.०५.२०२५ च्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०५१६१८०९१४५११९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARUN CHANGDEO KOLHE

Digitally signed by ARUN CHANGDEO KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=5954cbf120ac1f332056b65de0d4dfa85b619ad7d64fcd736ceb3dee77603425, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7AB6FCE2D956CE4C6E9BFC3EA1AB5FC2F17BEA07DB8AF21ACA4BEDED302CE9F9, cn=ARUN CHANGDEO KOLHE
Date: 2025.05.16 18:10:49 +05'30'

**( अरुण कोल्हे )**
**वित्तीय सल्लागार व सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त/नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव
५) मा. मंत्री, आपत्ती व्यवस्थापन यांचे खाजगी सचिव
६) मा. राज्यमंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव
७) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
८) महालेखापाल १/२, (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
९) मा.अपर मुख्य सचिव, मदत व पुनर्वसन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०) सबंधित जिल्हाधिकारी
११) संबंधित जिल्हा अधिदान अधिकारी
१२) वित्त विभाग (व्यय-९/) मंत्रालय, मुंबई
१३) कार्यासन ब-१, म-११, म-७ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती (म-११)